**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत एकात्मिक भात विकास प्रकल्प व ऊसाचे एक डोळा पध्दतीचे बेणे उत्पादित करण्याकरिता रोपवाटिका स्थापन करण्याच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता.**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि ०३१७/प्र.क्र.२३/राकृवियो कक्ष**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ जुलै, २०१७

**वाचा :**

१. शासन पत्र क्र. राकृवि-०५१७/प्र.क्र. ४२/राकृवियो कक्ष, दि. १२/०५/२०१७
२. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २३ व्या बैठकीचे इतिवृत्त-शासन पत्र क्र.RKV-०३१७/C.R.१४/RKVY CELL, Date. ९ जून, २०१७.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीची (SLSC) २३ वी बैठक दि. २५ मे, २०१७ रोजी मा. मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली पार पडली. या बैठकीत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत 'एकात्मिक भात विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणी प्रकल्प आणि एक डोळा पध्दतीने ऊस लागवडीसाठी रोपवाटिका निर्मिती प्रकल्प' या दोन प्रकल्पांची आगामी दोन वर्षामध्ये अंमलबजावणी करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

राज्यातील ज्या जिल्हयांचा राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - भात योजनेंतर्गत समावेश नाही अशा प्रमुख ९ भात उत्पादक जिल्हयांमध्ये एकात्मिक भात विकास प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यात येणार आहे. या प्रकल्पांतर्गत पिक प्रात्यक्षिक, सुधारीत वाणांचे बियाणे वितरण व शेती शाळा या माध्यमातून भात पिकाच्या उत्पादकतेमध्ये वाढ करणेसाठी विस्तार कार्य करण्यात येणार आहे. त्याचप्रमाणे, उन्नत शेती समृद्ध शेतकरी कार्यक्रमांतर्गत हाती घेण्यात आलेल्या यांत्रिकीकरणाच्या मोहिमेतून सदर जिल्हयांमध्ये भात पिकाच्या यांत्रिकीकरणासाठी आधुनिक यंत्र व औजारे देखील शेतकऱ्यांच्या मागणीनुसार उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत. या प्रकल्पांतर्गत समाविष्ट असलेल्या काही जिल्हयांमध्ये भात रोप वाटिकेची कामे माहे, मे महिन्यातच सुरु होत असल्याने संदर्भांकित दि. १२/०५/२०१७ रोजीच्या पत्रान्वये सदर प्रकल्पांतर्गत प्रस्तावित कामे हाती घेण्यास शासनाने मान्यता दिली होती आणि आता या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्प प्रकल्पाची पुढील दोन वर्षामध्ये अंमलबजावणी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

ऊसाची एक डोळा पध्दतीने लागवड करुन ऊसाचा उत्पादन खर्च कमी करणे तसेच उत्पादकतेत वाढ करण्याच्या अनुषंगाने ऊसाचे एक डोळा पध्दतीचे बेणे उत्पादित करण्याकरिता रोपवाटिका स्थापन करण्याच्या प्रकल्पास मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पांतर्गत शेतकऱ्यांना स्वत:च्या शेतावर ऊसाचे एक डोळा पद्धतीने बेण्यांचे उत्पादन घेण्यासाठी रोपवाटिका स्थापन करण्याकरिता अर्थसहाय्य् करण्यात येणार आहे. या प्रकल्पाव्दारे शेतकऱ्यांमार्फत ऊसाच्या दर्जेदार वाणांचे एक डोळा पद्धतीच्या बेण्यांचे मोठया प्रमाणात उत्पादन करणे अपेक्षित असून त्यांनी सदर बेणे परिसरातील शेतकऱ्यांना लागवडीसाठी उपलब्ध होईल. अशाप्रकारे, राज्यात ऊसाच्या एक डोळा पद्धतीच्या बेण्यांची अखंड पुरवठा साखळी निर्माण होणार आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २३ व्या बैठकीत उपरोक्त दोन प्रकल्पांना मिळालेल्या मंजूरीच्या अनुषंगाने या प्रकल्पांच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०१७-१८ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत एकात्मिक भात विकास प्रकल्प राज्यातील एकूण ९ जिल्हयांमध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या प्रकल्पाकरिता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत एकूण रु. ९५७.४० लाख (रुपये नऊ कोटी सत्तावन्न लाख चाळीस हजार फक्त) अर्थसहाय्य करण्यात येईल. सदर प्रकल्पाचे मंजूर घटक व त्यांचे पुढील दोन वर्षांकरिता भौतीक व आर्थिक लक्षांक पुढीलप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| अ. क्र. | बाब | प्रथम वर्ष लक्षांक | | व्दितीय वर्ष लक्षांक | | एकूण | | समाविष्ट जिल्हे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | |
| | प्रमाणित बियाणे वाटप | १०,००० क्विं. | १००.०० | १२,००० क्विं. | १२०.०० | २२,००० क्विं. | २२०.०० | ठाणे, पालघर रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नंदुरबार, अहमनगर, सांगली, कोल्हापूर |
| २ | प्रात्याक्षिक | ४७४८ हे. | ३५६.०० | ४७५० हे. | ३५६.२५ | ९४९८ हे. | ७१२.२५ | |
| ३ | शेती शाळा | ५२ | ७.२८ | ५२ | ७.२८ | १०४ | १४.५६ | |
| ४ | प्रशासकीय खर्च | - | ४.६३ | - | ५.९६ | - | १०.५९ | |
| **एकूण** | | - | **४६७.९१** | - | **४८९.४९** | - | **९५७.४०** | |

२. एक डोळा पध्दतीने ऊसाच्या लागवडीस चालना देण्याच्यादृष्टीने एक डोळा पद्धतीचे बेणे उत्पादित करण्यासाठी शेतकऱ्यांना रोपवाटिका स्थापनेसाठी अर्थसहाय करण्याच्या दृष्टीने राज्यातील १९ जिल्हयात ऊसाचे एक डोळा पध्दतीचे बेणे उत्पादित करण्याकरिता रोपवाटिका स्थापन करण्याच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. या प्रकल्पाकरिता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत एकूण रु. १५१५ लाख (रुपये पंधरा कोटी पंधरा लाख फक्त) अर्थसहाय्य करण्यात येईल. सदर प्रकल्पाचे मंजूर घटक व त्यांचे पुढील दोन वर्षांकरिता भौतीक व आर्थिक लक्षांक पुढीलप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **अ. क्र.** | **बाब** | **आर्थिक मापदंड** | **प्रथम वर्ष लक्षांक** | | **समाविष्ट जिल्हे** |
|---|---|---|---|---|---|
| | | | **भौतिक** | **आर्थिक** | |
| १ | एक डोळा पध्दतीने ऊस रोपवाटिका | ५ गुंठे क्षेत्रावरील रोपवाटिकेसाठी एकूण किंमतीच्या ५०% किंवा कमाल रु.१,२५,०००/- मर्यादेपर्यंत अनुदान | १२०० रोपवाटिका | १५०० | नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर, पुणे, सोलापूर, सातारा, सांगली, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली व भंडारा |
| २ | आकस्मिकता निधी | | - | **१५.००** | |
| **एकूण** | | | - | **१५१५** | |

३. सन २०१७-१८ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत एकात्मिक भात विकास प्रकल्प आणि ऊसाचे एक डोळा पध्दतीचे बेणे उत्पादित करण्याकरिता रोपवाटिका स्थापन करण्याचा प्रकल्प राबविण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना कार्यान्वयन तसेच संनियंत्रण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी प्रचलित योजनांना अनुसरुन मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात तसेच, प्रकल्पांतर्गत समाविष्ट जिल्ह्यांना भौतिक व वित्तीय लक्षांक विहीत करुन आवश्यकतेनुसार मंजूर निधीचे वेळोवेळी वितरण करावे.

४. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांकडे उपरोक्त दोन्ही प्रकल्पाचे निधी प्राप्त झाल्यानंतर तालुका कृषि अधिकाऱ्यांनी लाभार्थ्यांची निवड करुन सदर प्रकल्प राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका कृषि अधिकाऱ्यांच्या स्तरावर संकलित करण्यात यावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक याच्यासह, मोबाईल / दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. माहिती संकलित करण्यात यावी.

५. सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या बाबींची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर प्रकल्पांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी विहित करावे.

६. या प्रकल्पांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना वा सदर शेतक-यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे, त्याचप्रमाणे राज्य शासनाने चालू वर्षी ज्या घटकांखाली थेट लाभार्थ्यांच्या खाती अनुदान जमा करण्याचे (Direct Benefit Transfer) निदेशीत केले आहे त्या घटकांचे अनुदान थेट लाभार्थ्यांच्या बँक खाती जमा करण्यात यावा.

७. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत एकात्मिक भात विकास व उसाच्या एक डोळा पध्दतीने रोपवाटीका प्रकल्प राबविण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी सन २०१७-१८ या चालू वित्तीय वर्षात अखर्चित राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी काळजी घ्यावी. तसेच संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२९१८५१४६१८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b89650 25d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.07.31 11:44:31 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.

७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.

८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक

९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

१०.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.

११.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर

१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर

१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य

१४.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे

१५.मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१६.मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१७.निवड नस्ती.